*नवसाक्षर साहित्यमाला*

# पिठोरी अमावास्या

**कुसुमावती देशपांडे**

संक्षिप्तीकरण

**सुषमा सोनक**

चित्रे

**शशी शेट्ये**




**नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया**

खंडूचे वय वर्षे पाच. सोबत लहान बहीण. तिचे वय अंदाजे साडेतीन-चार. डब्याचे दार लागले. ती दोघे एका कोपऱ्यात सरकली. भेदरून एकमेकांना बिलगून उभी राहिली. खंडूच्या अंगात एक कुडते व



लंगोटी. नमीच्या अंगात एक कुठूनतरी मिळवलेले कुडतेवजा पोलके.

दोघांच्याही डोक्यावरून नीट गुंडाळून पाठीवर सोडलेले धोतराचे मोठेसे फडके. तेवढेच पावसाचे निवारण करणारे साधन. ते फडके आधीच ओलसर झालेले होते. तेच अंगाभोवती लपेटले होते. दोघेही एकमेकांना बिलगून उभी होती. दोघांचेही डोळे विस्फारलेले होते. भिरभिरत होते. डबा आणि आतील माणसांचा ठाव घेत होते.

गाडी सुटली. ''सांभाळ गा...'' बाहेरून त्या म्हाताऱ्याचा आवाज आला. वऱ्हाडी शेतकऱ्यांची दीनवाणी असहायता–ती साकार करणारे असे ते बाल युगुल. ते गाडीबरोबर हेलकावे खाऊ लागले. कुठे चालले होते ते–?

* * *

''या साली तरी दादा येतो का नाही, कोण जाणं...'' पार्वती मनाशीच बोलत होती. बोलता बोलता जळका तवा घासत होती. घासतांना वर तिने एक जोराचा घसटा दिला.

झोपडीच्या कडेला एका दगडावर ती बसली होती. पुढे दोनतीन खरकटी भांडी होती. एकदोन थाळे होते.

खालची जमीन खरकटे, राख व पाणी पिऊन काळी पडली होती. गाळाने बरबटली होती. जवळच एक ओबडधोबड ओटा होता. तो चारपाच दगड आणि विटांचे तुकडे जमवून बनवलेला होता. तिथे एकदोन घासलेली भांडी होती. पलीकडे दोन पाण्याची मडकी होती.





भांड्याचे पाणी रोज एकाच वाटेने वाहत जाई. ते आपला घाणीचा व काजळाचा रंग मागे ठेवून देई. अशी आपोआप एक काळीकुट्ट रेंदा भरलेली मोरी तिथे बनली होती. वाहत वाहत ते पाणी पुढे जाई. रस्त्याकडेची नाली मोरीहूनही अधिकच घाण होती. तिथे जाऊन ते पाणी मिळे.

अशा कितीतरी मोऱ्या तिथे वाहत येत. त्यांतील पाणी नालीला मिळत असे. तेथील दर झोपडीतून अशी एक मोरी येई. मोरीतले पाणी असेच रडतखडत जाई. जणू एकेक जण गावाचा, घाणीचा, काजळाचा– आपल्या दरिद्री वैभवाचा छाप मागे ठेवे. अन् मग नालीत जाऊन आपला जीव आहुती देई.



पार्वतीचा हात तवा घासता घासता थांबला. ते किटलेले पाणी पाहत तिची नजर पुढे पुढे गेली. नालीपावेतो गेली. परत आली. "कोन जाने येतो का नाही दादा—"

दोन दिवसांनी पिठोरी होती. गेल्या तीन वर्षांत तिने भावाच्या पाठीवर काकडी फोडली नव्हती. तिन्ही भाऊबीजांना तिने चंद्रालाच ओवाळले होते...

ती शेतकऱ्यांची सून, आणि शेतकऱ्याचीच बहीण होती. गेली पाचदहा वर्षे शेतकऱ्यांची परवड चालली होती. एका साली आषाढ उलटून गेला तरी पाण्याचा थेंब नाही. तर दुसऱ्या साली पेरण्या वाहून जाव्या... जेमतेम पोटापुरते धान्य निघावे. अशी चारपाच वर्षे गेली. तोवर घरात दोन जिवांची भर पडली होती. यंदा पेरणी बरी झाली होती. पार्वतीभोवती मनामनात आशेचे पीक कधीच पिकले होते; पण हातात अजून नुसती मागील सालची बाकीच होती ना! मग दादा कसा येणार...

पण तो आलाच. पुढील दारी पार्वतीचा सासरा चिलीम पीत बसलेला होता. तो मोठ्याने म्हणाला, "या लक्ष्मणदादा..."

पार्वतीच्या कानात जणू एकदम शिरशिरी आली.



"आलाच की..." तिचे ओठ पुटपुटले. तिचे हात चौपट वेगाने भांडी विसळू लागले. भर्रदिशी आटपून तिने भांडी ओट्यावर ठेवली. घाईने लुगड्याला हात पुसले. अन् ती दाराआड येऊन उभी राहिली.

मामंजी म्हणत होते—"पर दादा ह्ये तर गाडीची येळ बी न्हाई—कुठूनसे आलात?"

"असाच आलो पगा बाबाजी. या दिसांत कोठं हाती पैसा सांगा! पर आज तीन साल झालं, पोरीला न्येली न्हाई. मग इचार क्येला, चला पायीपायीच जाऊन घेऊन येऊ. पाहाटंच निघालो. तर येऊन गेलो दोन तासात. पांच कोस तर हाये. खंडू कोठं गेला?...खाऊ आणला त्यास..."

दारामागे पार्वतीचे मन भरून आले. ती हळूच पलीकडे अंगणात गेली. तिथे तिची तीन वर्षांची पोरगी खेळत होती. पोरीला हाक मारून ती म्हणाली, "अव जा...खंड्यास बोलाव. मामा आला नव्हं का..."

* * *

मामा आला म्हणून खंडू, नमी नाचू लागली. मामाने खांद्यावर पटकुरात बांधून खाऊ आणला होता. त्याच्याशी झगडू लागली. पार्वतीचा जीवही माहेरीच्या

ओढीने आनंदला. पण लक्ष्मणदादाला केवढी चिंता पडली...

बरोबर एक बंदा रुपया घेऊन तो घरून निघाला होता. तो पेटीतून काढतांना हात पुढेमागे झाला. वाटले की बंदा रुपया कशाला? आठ-बारा आणेच घेऊन जावे. पण व्याह्याघरी जायचे, तर असावा असेही वाटले. मग अभिमानाने त्याने तो रुपया हाती घेतला. कमरेभोवती धोतर आवळले होते, त्याच्या टोकाला नीट बांधला. खोचून दिला. यामुळे सालभरासाठी राखून ठेवलेली शिल्लक बरीच घटली होती. पण अशा वेळी कोणा गड्याचा हात सैल सुटत नाही?

दहेगावपासून पुलगाव दहा मैल तर दूर. झपाझप पावलांनी तो दोन अडीच तासात येऊन पोचला. पुलगाव नाका आला. एक लहानसे चहाचे दुकान दिसले. तिथे पाय घुटमळला. दहेगावच्या मानाने पुलगाव शहरवजाच वाटणार. ते लहानसेच दुकान केवढे मोठे वाटले! समोर अंगणात दोनचार बाकडी. अन् दोन तिपाई टेबले. ती किती अगत्याने बोलावीत होती. तो तेथे बसलाच. एक सिंगल मागविला. पळभर राजेशाही सुखात बुडला.

मग झाली पारीच्या पोरांची आठवण. जवळच



एक हलवाई होता. समोर एका लोखंडी थाळीत पेढे आणि अमृत्यांची चळद लावलेली होती. लक्ष्मणने खाडदिशी तिथून चार आण्याची मिठाई घेतली. आज तीन वर्षांनी पिठोरीच्या सणासाठी बहिणीला न्यायला आला होता तो. मग मुलांना खाऊ नको कां? पुडा बांधून घेतांना तो केवढातरी समाधानी दिसत होता! हौशीने पैसा खर्च करणे खरोखर आनंदाचे असते तर...

पण खंडू आणि नमी समोर खाऊ खात बसले अन् इकडे त्याच्या मनात वेगळीच विचारमालिका सुरू झाली. मुलांना आगगाडीनेच तर घेऊन जायचे होते. खंडू झाला होता पाच वर्षांचा; नमीला तिसरे संपून चौथे लागलेले. दोघां मिळून एक तर तिकीट काढायला पाहिजे! आणि पार्वती...आणि तो स्वतः...आणि खिशात तर केवळ दहा आणे चिल्लर भरलेली! व्याह्यांकडे जायचे यासाठी बंदा रुपया कनवटीस घेऊन तो निघाला. आणि तरीही वाटखर्चासाठी पैसे नाहीत अशी पाळी आली.

लक्ष्मणदादाचे मन भोवंडून गेले. एरवी एवढा बोलघेवडा तो. पण बाबाजी, पार्वतीचा नवरा महादू आणि तो जेवायला बसले, तसे त्याला काही सुचेना.

अखेर एक पाण्याचा घोट घेतला. जे होईल ते होवो असा पण केला. आणि मग तो बोलला, ''मग सकारच्या गाडीनं घेऊनशान जातो जी पारीला अन् पोराईला...''

बाबाजीने त्याच्याकडे पाहिले—थेट नजरेने पाहिले. लक्ष्मणची मान चटदिशी खाली झाली. शेतकऱ्यांची गुपिते शेतकऱ्यांसच समजायची. आणि गुपित तरी



काय होते? लक्ष्मणदादा दादा असला तरी पोरवजाच होता. अजून मनात अननुभवाचा कोवळेपणा होता. जुन्या जमान्यात व्याह्याबाबत वाटणारा संकोच कायम होता. कठीण दिवस नुकतेच त्यानेही पाहिले होते. पण अजूनतरी मनाचे रंग विटून गेले नव्हते. त्यामुळे टंचाई भासली तरी मुखावाटे बोल काढवत नसे... बाबाजीने नजरेला नुसती नजर भिडविली. तशी त्याची नजर चटकन खाली झाली.

पण बाबाजी लाखातला माणूस होता. त्याची नजर जाणती होती. तिला लक्ष्मणदादाच्या मनाचा नेमका थांग लागला. सकाळी लक्ष्मणबरोबर झालेले बोलणे आठवले. मग तो म्हणाला, "गाडीनं कायला जी सारेच? सुनबाई येईल की पायी तुम्हासंगं. दोपहारच्या गाडीनं पोरास्नी बसवून देऊ. तुम्ही दोजणं चालले जा मोठ्या पाहाटंच, अन् पोराईला ठेसनावर उतरून घ्या. असं काय लई दूर थोडंच हाय! का वं सुनबाई?..."

सुनबाईचे कमळ कधीचेच उमलले होते; पण एके काळच्या मातबर घरंदाज घरातली ती पोरगी. अजूनही शालीन राहिलेली. ती नुसते म्हणाली, "हो जी..."

* * *



आणि मग पहाटे पाखरांचा किलबिलाट सुरू झाला. भाऊ-बहीण दोघेजण या किलबिलाटात दहा मैलांची वाट चालू लागली. इकडे चाराच्या गाडीत त्या लहान बहीण-भावंडांची जोडी बसवली गेली. सांजवेळेचा पाऊस सुरू झालेला होता. पोरांनी आपली धोतराची फडकी अंगाभोवती अगदी लपेटून घेतली होती. एकमेकांना बिलगून ती दोघे तिथे बंद दारामागे अंग चोरून उभी राहिली होती. त्या चिमण्या जिवांचा तो पहिलाच प्रवास! आणि तोच त्यांना एकट्याने करावा लागला होता. ती दोघे भेदरून सभोवार पाहत होती. आधी जिथे उभी होती तिथेच जणू खिळली होती. बाबाजीने खंडूच्या अंगावरील धोतराच्या टोकाला तिकीट बांधून दिले होते. ते त्याने अजूनही मुठीत घट्ट आवळून धरले होते.

पावसाचा जोर वाढला. नमी कावरीबावरी होऊ लागली. चुळबुळ करू लागली. मुठींनी डोळे चोळू लागली. आणि मग घोगऱ्या आवाजात खंडूला म्हणू लागली—

"दादा ऽ माय..."

"आं ऽ ऽ ऽ"

"माय भिजल पाण्यामंधि..."

"आव चूप...माय बसली बी असल ठेसनामंधि..." खंडूने वडिलकीने ठसक्यात उत्तर दिले.

गाडी धाडधाड चालली होती. तिच्या वेगात तिच्या तालात आतली माणसे डुलत होती. ती पोरेही उभीउभीच हिंदकळली जात होती; एकमेकांच्या अंगावर आदळली जात होती.

दहेगाव आले. मामा व आई दिसली.

नमी ओरडली, "मा ऽऽ व ऽऽ"





Printed at Tarang Printers, F-40, Site "C", Surajpur Industrial Area, Greater Noida (U.P.)